सांख्यिकी पर्यवेक्षक,गट-क (वेतनश्रेणी एस-१४ रु.३८६००-१२२८००/-) या संवर्गातून सांख्यिकी अधिकारी, अधिकारी, गट-ब सामान्य राज्य सेवा (वेतन श्रेणी एस-१५ रु.४१८००-१३२३००/-) या संवर्गात तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापनेबाबत..

# महाराष्ट्र शासन

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन आदेश क्रमांक : संआसे-२०२४/प्र.क्र.६६ /सेवा-१**

गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल, ८ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दि. २८ फेब्रुवारी, २०२५.

**वाचा :-** सहसंचालक (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई यांचे क्र.आसेआ/सारासे/गट-ब/कक्ष-४/सांआ/पदोन्नती प्रस्ताव/३८७/२०२४,दि.१२.०२.२०२४ रोजीचा प्रस्ताव.

**शासन आदेश:-**

आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई या कार्यालयाअंतर्गत सांख्यिकी पर्यवेक्षक, गट-क (वेतनश्रेणी एस-१४ रु.३८६००-१२२८००/-) या संवर्गातून सांख्यिकी अधिकारी, गट-ब सामान्य राज्य सेवा (वेतनश्रेणी एस-१५ रु.४१८००-१३२३००/-) या संवर्गात पदोन्नतीच्या वाटयातील पदांवर तात्पुरती पदोन्नती देण्यात येऊन खालील अधिकाऱ्यांना पुढीलप्रमाणे सांख्यिकी अधिकारी, गट-ब या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | प्रवर्ग | सांख्यिकी अधिकारी या पदावर तात्पुरत्या पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.अशोक शंकर गाडीलकर | इमाव | **सहसंचालक, आरोग्य सेवा, (कुष्ठ व क्षयरोग),पुणे यांचे कार्यालय.** |
| २. | श्री.राजेंद्र रामचंद्र पाटील | खुला | **उपसंचालक, आरोग्य सेवा,छत्रपती संभाजीनगर यांचे कार्यालय.** |
| ३. | श्री.चंद्रकांत गणपतराव जाधव | खुला | **जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती यांचे कार्यालय.** |
| ४. | श्री.सुनिल शंकर कदम | खुला | **जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद नाशिक यांचे कार्यालय.** |

०२. पदोन्नतीच्या वाटयातील पदांवरील पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाजेष्ठतेनुसार रिक्त पदांवर पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत.

२) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६०, दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सुचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे.तसेच दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा.उच्च न्यायालय,मुंबई येथे आव्हान देण्यात आले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर सहमती दर्शविण्यात येत आहे.

३) सदर तात्पुरती पदोन्नती ही दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२०.०४.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

४) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असल्याने वरील पदोन्नत अधिकाऱ्यांना नियमितपणाचा, सेवाज्येष्ठतेचा व अनुषंगिक बाबींसाठी कोणताही हक्क मिळणार नाही.

५) सदर तात्पुरती पदोन्नती या अधिकाऱ्यांची कोणतीही विभागीय चौकशी सुरु नाही, या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

६) सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपाची असून त्यामुळे कायमस्वरूपी धारणाधिकार प्राप्त होणार नाही.

०३. या अधिकाऱ्यांनी या पदोन्नतीचा स्विकार हे आदेश मिळाल्यापासून एक महिन्यात करावा, अन्यथा त्यांची पदोन्नती कोणतीही पूर्वसूचना न देता रद्द करण्यात येईल. या अधिकाऱ्यांनी त्यांच्या पदोन्नतीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. त्यांनी कोणतीही रजा घेतल्यास ती अनधिकृत अनुपस्थिती समजण्यात येईल व त्यामुळे त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता आहे. या अधिकाऱ्यांनी त्यांच्या नियुक्तीच्या आदेशात बदल करून मिळण्यासाठी कोणताही दबाव आणल्यास त्यांच्यावर शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल.

०४. या अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या नियंत्रक अधिकाऱ्यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे तसेच त्यांच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणच्या नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांना रूजु करून घ्यावे व त्याप्रमाणे कार्यमुक्त / रूजु अहवाल आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

०५. हा शासन आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने निगर्मित करण्यात येत आहे.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०२२८१५३१०९६२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH MADHUKAR LAD

Digitally signed by MAHESH MADHUKAR LAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=25beab36016c9d18b34e813ce2c51ae3ba862f5ee940326a80ef8dfa067b2f3b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B0B7B24B48EA4D47E171EF81F64A0D535EBB08400DA6060265D4872BADAEACA, cn=MAHESH MADHUKAR LAD
Date: 2025.02.28 15:32:02 +05'30'

**( महेश म.लाड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई,
२. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपुर.
३. संचालक-१/२, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई/पुणे.
४. सहसंचालक आरोग्य सेवा (हि.ह.व.ज). पुणे.
५. सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, पुणे कार्यालय.
७. संबंधित उप संचालक, आरोग्य सेवा मंडळे.
८. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
९. संबंधित जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद.
१०. संबंधित जिल्हा शल्य चिकित्सक.
११. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३. संबंधित सांख्यिकी अधिकारी, गट-ब (संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे मार्फत)
१४. सामान्य प्रशासन विभाग (कार्या-२१)
१५. सार्वजनिक आरोग्य विभाग निवडनस्ती